अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील
संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी,
गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांचा
परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन आदेश क्रमांक- इएसटी-१०१९/प्र.क्र.१८/का.१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
६ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १५ जानेवारी, २०२०

वाचा:- १) नियोजन विभाग, शासन आदेश क्रमांक: नामनि-१२१५/प्र.क्र.११८/का.१४२७, दिनांक ३०/०१/२०१६.
२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवि-१४१७/गट-ब (राज)/७५/भाग-३/प्रशा-२/२३, दिनांक ०३/०१/२०२०.

## कार्यालयीन आदेश :

नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील पदावर ३७ अधिकाऱ्यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली असून सदरहू नियुक्ती आदेशात संबंधित अधिकारी दोन वर्षे परिविक्षा कालावधीवर राहतील, असे नमूद करण्यात आलेले आहे. सदर उमेदवारांना नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे, दोन वर्षांच्या कालावधीत विहित विभागीय परीक्षा (जर काही असल्यास) आणि संगणक हाताळणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते. तसेच, हिंदी व मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे किंवा त्यातून सूट मिळणे आवश्यक होते. तसेच सदरहु दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीत परिविक्षा अधिकाऱ्यांनी जर रजा उपभोगलेली असेल; तर त्या रजेच्या कालावधीएवढा परिविक्षा कालावधी शासन परिपत्रक क्र.५३४६/४६, दिनांक २६ ऑगस्ट, १९५२ नुसार वाढविणे आवश्यक आहे.

२. नियोजन विभागाचे संदर्भाधिन आदेश क्रमांक १ अन्वये "संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)" संवर्गात नियुक्त करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांपैकी, खालील तक्त्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यानी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या आहेत.

३. अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये श्रीमती साळुंखे प्राजक्ता विलासराव यांनी एकुण ४१७ दिवसांची रजा परिविक्षा कालावधीमध्ये उपभोगली आहे. रजेचा तपशिल खालील तक्त्यात दर्शविलेला आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | रजेचा तपशिल | | |
|---|---|---|---|---|
| | | कालावधी (दिनांकामध्ये) | रजेचा प्रकार | रजेचा एकुण कालावधी |
| (१) | (२) | (४) | (५) | (६) |
| १ | श्रीमती साळुंखे प्राजक्ता विलासराव | ०९/०५/२०१६ ते ०७/०६/२०१६ | असाधारण | ३० दिवस |
| | | ०१/०८/२०१६ ते १३/१०/२०१६ | असाधारण | ७४ दिवस |
| | | १८/१२/२०१६ ते १७/०६/२०१७ | प्रसुती रजा | १८० दिवस |
| | | १८/०६/२०१७ ते १७/०७/२०१७ | अर्जित | ३० दिवस |
| | | २०/०९/२०१७ ते ०८/१०/२०१७ | अर्जित | १९ दिवस |
| | | १७/१०/२०१७ ते ०२/११/२०१७ | परिवर्तीत | १७ दिवस |
| | | ०३/०१/२०१८ ते ०७/०२/२०१८ | विशेष | ३६ दिवस |
| | | १६/०२/२०१८ ते २४/०२/२०१८ | अर्जित | ९ दिवस |
| | | २५/०२/२०१८ ते ०२/०३/२०१८ | अर्जित | ६ दिवस |
| | | २१/०१/२०१९ ते ३१/०१/२०१९ | अर्जित | ११ दिवस |
| | | ०१/०४/२०१९ ते ०५/०४/२०१९ | परिवर्तीत | ५ दिवस |

४. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन श्रीमती साळुंखे प्राजक्ता विलासराव यांचा परिविक्षाधिन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक ४ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्रमांक ५ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे नांव | नियुक्ती दिनांक | परिविक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक | संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी पदावरील सेवा नियमितपणे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती साळुंखे प्राजक्ता विलासराव | २५/०२/२०१६ | १८/०४/२०१९ | १९/०४/२०१९ |

५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सदर कार्यालयीन आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

६. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर कार्यालयीन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११५१११११३०१४१६ असा आहे. हा कार्यालयीन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.01.15 16:07:58 +05'30'

**( तु. पु. हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
३. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
४. संबंधित अधिकारी (मार्फत:- अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)
५. निवड नस्ती.